**मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौ. मिचगांव (ता. धानोरा, जि. गडचिरोली) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०१८/प्र.क्र.१०१/पापु-१९

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकूल, नवीन इमारत, ७ वा माळा,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीखः १८ जून, २०१८

वाचा

१) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परिषद, गडचिरोली यांचे पत्र क्रमांक: जिपग/ग्रापापु/तांशा-२/९११/२०१८, दिनांक ०६ एप्रिल, २०१८
२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परिषद, गडचिरोली यांचे तांत्रिक मंजूरी आदेश क्रमांक: जिपग/ग्रापापु/तांशा-२/१०४५/२०१८, दिनांक २७ एप्रिल, २०१८
३) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-०७, दिनांक १७ मार्च, २०१०
४) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१३
५) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११३/प्र.क्र.१५६/पापु-०७, दिनांक २२ जानेवारी, २०१४
६) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक ०९ जुलै, २०१४
७) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१४
८) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११५/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक १६ फ़ेब्रुवारी, २०१५
९) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११११/प्र.क्र.१३४/पापु-०७, दिनांक २० फ़ेब्रुवारी, २०१५
१०) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १० मार्च, २०१५
११) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७, दिनांक १५ जून, २०१५
१२) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६
१३) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१६/प्र.क्र.८३/पापु-१९, दिनांक २५ जानेवारी, २०१७
१४) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.११०/पापु-१९, दिनांक १४ जुलै, २०१७

**प्रस्तावना:-**

मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत समाविष्ट असलेल्या मौ. मिचगांव (ता. धानोरा, जि. गडचिरोली) येथील नळ पाणी पुरवठा योजनेचे रु.६१.८१ लक्ष इतक्या किंमतीचे अंदाजपत्रक दरडोई खर्च हा शासन निकषापेक्षा जास्त असल्याने संदर्भाधीन क्र.१ येथील पत्रान्वये प्रशासकीय मान्यतेसाठी

शासनास सादर केले आहे. सदर योजनेच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परिषद, गडचिरोली यांनी संदर्भाधीन क्र.२ येथील आदेशान्वये तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. तसेच मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे अध्यक्षतेखालील तांत्रिक समितीच्या दि.१५ मार्च, २०१८ रोजीच्या बैठकीत सदर योजनेच्या सविस्तर प्रकल्प अहवालास मंजूरी देण्यात आली आहे. त्यानुसार मौ. मिचगांव (ता. धानोरा, जि. गडचिरोली) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.६१.८१ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, मौ. मिचगांव (ता. धानोरा, जि. गडचिरोली) येथील ४० लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेच्या व रू. ४४९२/- इतका दरडोई खर्च असलेल्या नळ पाणीपुरवठा योजनेच्या रू.६१.८१ लाख (अक्षरी रूपये एकसष्ट लाख एक्याऐंशी हजार फक्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत खालील अटी व शर्तींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

I. सदर योजनेची अंमलबजावणी जिल्हा परिषदेमार्फ़त करण्यात यावी. योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर किमान ३ वर्षे योजना चालविणे कंत्राटदारावर बंधनकारक राहील. योजना यशस्वीरित्या पूर्ण झालेली आहे याची खात्री जिल्हा परिषदेने करावी, तसेच योजनेच्या देखभाल दुरुस्तीसाठी संदर्भाधीन क्र.७ येथील दि.१७ ऑक्टोबर, २०१४ रोजीच्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचा अवलंब करावा.

II. योजनेची कामे विहीत पध्दतीने ई- निविदा मागविण्यात येऊन करावीत. योजनेचे काम प्रशासकीय मान्यता प्राप्त किंमतीमध्येच पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी. योजनेची किंमत वाढल्यास त्याला राज्य शासन जबाबदार राहणार नाही व अशा योजना कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यास पात्र राहतील. तसेच त्याची शासनस्तरावर गंभीर दखल घेऊन संबंधितांविरुध्द शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल.

III. योजनेसाठी आवश्यक भुसंपादन व इतर परवानग्या प्राप्त झाल्याशिवाय योजनेच्या कामाचे कार्यारंभ आदेश देण्यात येऊ नयेत. सदर अटीची पूर्तता न करताच कार्यारंभ आदेश देण्यात आल्यास या शासन निर्णयान्वये देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द समजण्यात येईल.

IV. योजनेत समाविष्ट किमान ८० टक्के लाभार्थ्यांकडून/नळजोडणी धारकाकडून स्वखर्चाने मीटरजोडणी घेणेबाबत व योजनेच्या देखभाल दुरुस्तीकरिता आवश्यक पाणीपट्टी भरणेबाबत हमीपत्र प्राप्त झाल्याशिवाय योजनेच्या कामाचे कार्यारंभ आदेश देऊ नयेत.

V. योजनेची कामे मंजूर किंमतीत कालबध्द व नियोजनबध्दरित्या टप्या-टप्याने पुर्ण करण्यात यावीत.

VI. योजनेचा उद्भव विकसित झाल्याशिवाय इतर कामे सुरु करु नयेत. उद्भवामध्ये पुरेसे पाणी उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतरच योजनेतील इतर कामे करावीत.

VII. योजना चालविणे व देखभाल दुरूस्ती यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता संबंधित ग्रामपंचायतीने योजनेच्या अंमलबजावणीसाठी प्रस्तावामध्ये नमूद केल्यानुसार घरगुती, बिगर घरगुती व संस्थात्मक नळजोडणी धारकासाठी पाणी पट्टीचा दर निश्चित करावा व त्यात कालपरत्वे वाढ करण्यात यावी.

VIII. योजना चालविणे त्याचे परिरक्षण व देखभाल दुरुस्ती यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस/महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास शासनाकडून कोणतीही मदत/अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

IX. योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळ जोडण्यांचा समावेश करण्यात यावा.

X. संदर्भाधीन क्र.५ येथील २२ जानेवारी, २०१४ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार हागणदारी मुक्तीचे धोरण राबविण्यात यावे.

XI. कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास शासनाकडून जादा अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

XII. सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटींची पुर्तता करण्यात यावी. तसेच संदर्भाधीन क्र.१२ येथील दि.०७ मे, २०१६ च्या शासन निर्णयातील तरतुदीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

XIII. संदर्भाधीन क्र.११ येथील दि.१५ जून, २०१५ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार योजनेचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करणे अनिवार्य राहील.

XIV. योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी निश्चित करणे व त्यात आवश्यकतेनुसार वाढ करणे ग्रामपंचायतीस बंधनकारक राहील. याबाबत जिल्हा परिषदेच्या अधिकाऱ्यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना स्पष्टपणे सविस्तर माहिती द्यावी व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरूवात करावी.

XV. योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने योजना पुर्णत्वाचा दाखला सक्षम प्राधिका-याकडे सादर करणे बंधनकारक राहील.

XVI. योजनेच्या अंमलबजावणीमध्ये कोणत्याही स्वरुपाची अनियमितता, अपहार अथवा गैरव्यवहाराच्या बाबी निदर्शनास आल्यास अनियमिततेस जबाबदार संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र राहतील.

XVII. संदर्भाधीन क्र.१२ येथील दि.०७ मे, २०१६ रोजीच्या शासन निर्णयानुसार ग्रामीण पाणीपुरवठा योजनांकरिता विहित केलेली मानके पूर्ण करणे बंधनकारक राहील.

XVIII. योजनेच्या प्रगतीप्रमाणे खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे व योजनेच्या पुर्णत्वाचे दाखले संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून प्राप्त करुन घेवून शासनास सादर करण्याची जबाबदारी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो), बेलापूर यांची राहील.

२. या योजनेवर होणारा खर्च मागणी क्र. वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(२६) मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम (२२१५ ९९४२)- ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखालील तरतुदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१८१२१६२१९४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ram Apparao Sabane

Digitally signed by Ram Apparao Sabane
DN: CN = Ram Apparao Sabane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2018.06.18 16:11:52 +05'30'

**(रा. अ. साबणे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्य मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,

५) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
६) जिल्हाधिकारी, गडचिरोली
७) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, भूजलभवन, शिवाजीनगर, पुणे.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली
९) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई
१०) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
११) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नागपूर
१२) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१३) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परिषद, गडचिरोली
१४) कार्यासन पापु-०४ व पापु-२० पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवड नस्ती (पापु-१९)